# बार्नी नावाचा कुत्रा

लेखिका: **जीन बेथेल**

चित्रे व सजावट: **रूथ वुड**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**



# बार्नी नावाचा कुत्रा

लेखिका: **जीन बेथेल**

चित्रे व सजावट: **रूथ वुड**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**



# पाळीव प्राण्यांचे दुकान




काय, कसं काय?

माझं नाव बार्नी बीगल.

मी बीगल जातीचा कुत्रा आहे.



मी एका पाळीव प्राण्यांच्या दुकानात राहतो.

आणि हे आहेत माझे मित्र.

आम्ही सगळे  मिळून इथे मजेत राहतो. .



मला आमचं हे दुकान आवडतं.

पण मला इथे कायम रहायचं नाही.

मला एका घरात

एका मुलाबरोबर राहायचं आहे.

मी योग्य मुलाची वाट पाहतोय.

तो लवकर आला तर बरं होईल.

आता एक मुलगा इकडे येतो आहे.

तो माझ्यासाठी येतो आहे का?

बघूया.



नाही.

त्याला एक बॉक्सर जातीचा कुत्रा हवा आहे.

त्याच्याकडे पाहूनच कळतंय.





तो बॉक्सरचे पैसे देतोय.

आणि आता तो बॉक्सरला घेऊन घरी निघाला आहे.

ते किती खुश दिसतात.

अच्छा, बॉक्सर!



मला नेणारा मुलगा कधी बरं येईल?

कोणीतरी इकडेच येतंय!

हा मुलगा माझ्यासाठी येतोय का?

असेल तर किती बरं होईल.





नाही, ही तर एक मुलगी आहे.

तिला पुडल जातीचा कुत्रा आवडत असेल.

तिच्याकडे पाहूनच कळतंय.



ती मुलगी आता पुडलचे पैसे देतेय.

आता ती पुडलला घेऊन

घरी निघाली आहे.

ते दोघे किती आनंदात दिसतात.

बाय, बाय, पुडल !

आता माझा मुलगा कधी बरं येईल?





आता कोणीतरी इकडे येतंय.

हा माझ्यासाठी असेल का?






हा एक मोठा माणूस आहे.

मला वाटतं, त्याला कोणता कुत्रा हवा आहे ते मला माहित आहे.

हो, त्याला शीपडॉग जातीचा कुत्रा हवा असणार.

कोणालाही ते सहज समजेल.



तो आता त्याच्या कुत्र्याचे पैसे देतोय.

आता ते घरी निघाले आहेत.

ते खुशीत दिसतात.

अच्छा, बाय, शीपडॉग!





आता मला न्यायला कोणीतरी केव्हा येईल?

रोज किती तरी मुले आणि मुली

या पाळीव प्राण्यांच्या दुकानात येत असतात.



रोज ही मुले आणि मुली

आपल्या कुत्र्यांना घेऊन घरी जात असतात.

ते सगळे किती खुशीत दिसतात!



पण मला नेणारा माझा

मित्र कुठे आहे?

तो कुठे बरं असेल?




आज या दुकानात

आम्ही दोघेच राहिलो  आहोत.

मी, बार्नी बीगल,

आणि माझा ठिपकेवाला मित्र.

आम्ही अजून वाट पाहत आहोत.

आता कुणीतरी इकडेच येतंय.

एक मुलगा आला आहे.









कदाचित, कदाचित,

तो माझ्यासाठीच आला असेल का?

नाही. तो ‘स्पॉट’ नावाच्या

ठिपके वाल्या कुत्र्यासाठी आला आहे.

ते पाहूनच समजतंय!



त्याने आता पैसे दिले.

तो आता आपल्याबरोबर

स्पॉटला घरी घेऊन निघाला आहे.

ते किती खुश दिसतात.

बाय, स्पॉट, बाय बाय!

आता कुणीतरी इकडे येतंय!

एक मुलगाच आहे.

कदाचित... अखेर...





आता माझे सगळे मित्र गेले आहेत.

मी अगदी एकटाच आहे.

इथे एकटं राहण्यात काहीच मजा  नाही.

मला न्यायला कुणी आलं तर किती बरं होईल.




नाही. तो माझा मित्र नाही.

ते पाहूनच कळतंय.



ए, बस कर आता!

जा बघू!

मला सोड आता.

बस झालं.





या मुलाला मी हवा आहे.

पण मला त्याच्याकडे जायचं नाही.

त्याला मला घरी न्यायचं आहे.

पण मी त्याच्याबरोबर जाणार नाही.





आता बघ!

हा मुलगा वेडाच आहे.

पण आता मी खुश आहे.





तो निघून गेलेला पाहून मला बरं वाटलं.

पण मला इथे एकट्याला राहायला आवडत नाही.

माझा मित्र मला न्यायला येण्याची मी वाट पाहतोय.



आता खूप उशीर झाला आहे.

दुकानदाराला आता घरी जायचं आहे.

मग रात्री मी एकटाच असेन.

माझा मित्र कधीच येणार नाही का...



कोणीतरी इकडे येतंय.

पण मला तिकडे पहायचं नाही आहे.

कदाचित, कदाचित, कदाचित...



एक मुलगा आला आहे.

हो तो माझ्यासाठीच आला आहे!

कुणालाही ते पाहूनच समजेल.

तू आलेला पाहून मला किती बरं वाटलं!

मी तुझी किती वाट पाहत होतो!



आता त्याला माझ्यासाठी पैसे द्यायचे आहेत.

मग तो मला घरी घेऊन जाईल.





चल, जाऊया! चल जाऊया!

चल ना! चल!

आपण घरी का जात नाही?



दुकानदार पैशांकडे पाहतो आहे.

“तुला आणखी पैसे द्यावे लागतील,”

तो माझ्या मित्राला म्हणाला.



आता माझा मित्र दुःखी झाला आहे.

“पण माझ्याकडे फक्त एवढेच पैसे आहेत,”

तो हळूच म्हणाला.



तो माझी किंमत देऊ शकत नाही.

म्हणजे मला तो घरी घेऊन जाणार नाही!



“प्लीज?” माझा मित्र म्हणाला.

“हा तर लहानसाच आहे.”

दुकानदाराने माझ्याकडे पाहिलं.

मग मुलाकडे पाहिलं.

आणि तो विचार करू लागला.





मग तो हसला आणि म्हणाला,

“हो, खरं आहे, बार्नी लहानसाच कुत्रा आहे.

आणि घरी जाण्यापूर्वी

मला त्याला विकायचे आहे.

चालेल, तू त्याला घेऊन जा.”



हुर्रे! हुर्रे!

अखेर मला माझा मित्र भेटला!



“चल, बार्नी, आपण घरी जाऊया,”

माझा मित्र म्हणाला.



बाय, बाय, दुकान!

बाय, बाय, दुकानदार.

मी आता माझ्या मित्राबरोबर घरी चाललो आहे!





मला वाटतं की प्रत्येक कुत्र्याला

एक मित्र असावा.

नाही का?

समाप्त